"अल्लाहच्या नावाने जो असीम दयावंत व परम कृपावंत आहे"

# मनुष्य समाजप्रिय आहे

पृथ्वीवर जेव्हापासून मनुष्याचा जन्म झालेला आहे, तो मिळून-मिसळून राहत आहे आणि सामाजिक जीवन व्यतीत करीत आहे. हा त्याचा स्वभाव आहे. तो आपल्या स्वभावाच्या दृष्टीने समाजात राहणे पसंत करतो. आपल्या सहजातीय लोकांशी मिळून-जुळून राहू इच्छितो. याचसोबत तो त्यांच्या सहयोगाचासुद्धा मोहताज आहे. त्याशिवाय तो आपल्या जीवनाच्या आवश्यकताच पूर्ण करू शकत नाही. तर त्याच्याशिवाय त्याचे अस्तित्व आणि जीवनसुद्‌धा मोठ्या संकटात पडून जाईल.

## समाजाचा आरंभ कुटुंबाने

मानवाच्या सामाजिक जीवनाचा आरंभ त्याच्या निकटतम लोकांशी होतो. हेच त्याचे घराणे आणि कुटुंब आहे. या गोष्टीला या प्रकारेसुद्धा सांगितले जाऊ शकते की, "परिवार" ती सर्वप्रथम संस्था आहे जिच्यापासून मनुष्याने सामाजिकतेचा धडा घेतला. या जगतात आल्यानंतर मानवाला सर्वप्रथम ज्या सहाय्यतेची आवश्यकता असते ती त्याला कुटुंबापासूनच मिळते. कुटुंबाशिवाय त्याची आशाच केली जाऊ शकत नाही.

## कुटुंबाचे महत्त्व आणि आवश्यकता

कुटुंबातील लोकांमध्ये एकमेकांच्या आवश्यकतांना पूर्ण करणे, त्यांच्या अपेक्षांवर पूर्ण उतरणे. तसेच त्यांच्यात संरक्षण व देखरेखीची भावना आढळून येते. परिवारामध्ये प्रत्येक व्यक्तीला हे समाधान असते की, त्याच्या आवश्यकता पूर्ण होत राहतील आणि कोणतीही गंभीर परिस्थिती आली तर त्याचे संरक्षण केले जाईल. हे सर्व काही स्वाभाविक रूपाने आणि कोणत्याही दडपणाशिवाय होत असते. परिवाराच्या अनेक समस्या असतात. कुटुंबाचे लोक मिळून मिसळून त्यांची सोडवणूक करत असतात. त्यांना ते ओझे नव्हे तर जबाबदारी समजत असतात.

या प्रकारे कुटुंब अथवा कुटुंबांचा एक मोठा लाभ हा आहे की, व्यक्तीच्या चारी बाजूंकडे त्यांचे शुभचिंतक आणि दुःखात सहभागी होणारे लोक हजर

असतात. त्याच्यामध्ये तो स्वत:ला सुरक्षित आणि शांतीत पाहतो आणि ही माणसे संकटांमध्ये आणि अडचणींमध्ये त्याच्या कामात येतात.

कुटुंबाशी मनुष्याचा भावनात्मक संबंधसुद्धा असतो. तो त्यांच्याशी जवळीक आणि आपलेपणाचा आभास करतो आणि दु:ख व आरामात त्यांचा सहभाग इच्छितो. कुटुंब व परिवाराचे लोक त्यांच्या आनंदास द्विगुणित करत असतात. त्यांचे प्रेम आणि सहानुभूती त्यांची पीडा आणि कष्टांना कमी करते आणि समाधान देत असते. परिवार त्याची आवश्यकतासुद्धा आहे आणि त्याच्यासाठी समाधानाचे साधनसुद्धा.

## कुटुंब समाजाचा पाया आहे

कुटुंब लहानसुद्धा असू शकते आणि मोठेसुद्धा अनेक कुटुंबांच्या एकत्रित येण्याने समाज अस्तित्वात येत असतो. कुटुंबाच्या मजबुती आणि कमजोरीशी समाजाची मजबुती आणि कमजोरी जुळलेली आहे. परिवाराचा पाया मजबूत (दणकट) असला तर समाजास मजबुती आणि स्थायित्व प्राप्त होईल. जर तो अशक्त असेल तर संपूर्ण समाज अशक्तता आणि शिथिलतेला बळी पडतो. इमारतीची जर एक-एक वीट पक्की असेल तर तिच्याने पूर्ण इमारत दणकट (मजबूत) होत असते. कच्च्या आणि कमजोर वीटांनी दणकट इमारतीची कल्पना केली जाऊ शकत नाही. कुटुंब तो पायाचा दगड आहे की, आपल्या जागेवरून सरकला तर पूर्ण समाजाच्या चुली हादरून जातात आणि संबंधामध्ये बिघाड व गोंधळ निर्माण होऊ लागतो. कुटुंबाच्या तुटण्याने ते साखळदंड तुटून जातात ज्याच्याशी मनुष्याचा संबंध असतो. त्या व्यक्ती ज्यांना मनुष्य आपले समजतो, जे त्याच्याशी अत्यंत निकट असतात, तेही दूर होत जातात आणि एक दुसऱ्यांच्या सहयोगासाठी तयार होत नाहीत. ते सर्व संबंध जे परिवारामुळे अस्तित्वात येतात आणि परिवारा टिकून राहीपर्यंत बाकी राहतात, त्या तुटताच संबंध नष्ट होऊन जातात आणि मनुष्य कुटुंबाच्या शांतीपासून वंचित होऊन जातो. कुटुंबाचे तुटने काही साधारण गोष्ट नाही. हा इतका मोठा तोटा आहे की कोणताही समाज त्याला अधिक दिवसांपर्यंत सहन करूच शकत नाही.

## कुटुंबाची खरी निर्मिती पैगंबराद्वारे होत असते

ही सुद्धा एक वास्तविकता आहे की, प्रत्येक परिवार उदाहरणीय नसतो. अनेक परिवारांमध्ये मतभेद आढळले जातात. त्यांच्यात मधुर संबंध आढळले जात नाहीत. ते एकमेकांचे अधिकार जाणत नाहीत. याचे कारण पारिवारिक व्यवस्थेचे बिघाड नाही, तर हा वैयक्तिक स्वार्थांचा आणि हितांचा संघर्ष आहे. जेव्हा कधी मनुष्याचे व्यक्तिगत हित परिवाराच्या हितांवर प्रभावी होतात आणि त्याला नुकसानीस सामोरे जावे लागते. याचा इलाज हा आहे की, मनुष्याने कुटुंबाची आवश्यकता आणि त्याच्या महत्त्वाची जाणीव करून घ्यावी आणि त्याला क्षति न पोहचू द्यावी. अल्लाहच्या पैगंबरांच्या उपकारामधून एक उपकार हासुद्धा होता की, कुटुंबात जे बिघाड आणि गोंधळ निर्माण होतात ते त्यांचा सुधार करत आणि योग्य पद्धतीने त्याच्या निर्मितीचे कर्तव्य पार पाडत. त्यांचा प्रयास असे की, परिवार शांती आणि समाधानाचे निवासस्थान आणि एक आदर्श संस्था बनून जावी.

## पैगंबरांनी कौटुंबिक जीवन व्यतीत केले

अल्लाहचे पैगंबर जे त्याचे निवडलेले आणि त्याचे सर्वांत अधिक प्रिय दास असतात. पारिवारिक अथवा कौटुंबिक जीवन व्यतीत केलेले आहे आणि त्याच्या अपेक्षांना पूर्ण केले आहे. पवित्र कुरआनने याचे स्पष्टीकरण या शब्दांत केले आहे,

‘‘तुमच्यापूर्वीदेखील आम्ही अनेक पैगंबर पाठविले आहेत आणि आम्ही त्यांना पत्नि व मुले बाळे (संतान) असलेलेच बनविले होते.’’

(दिव्य कुरआन १३ : ३८)

पवित्र कुरआनने अनेक पैगंबरांच्या पत्नींचा, मुलाबाळांचा आणि परिजनांचा उल्लेख केलेला आहे. यावरून त्या पैगंबरांचा आपल्या कुटुंबीयांशी संबंध, त्यांचे प्रेम, सहानुभूती, निष्ठा आणि शुभेच्छा आणि कुटूंबीयांचा त्यांच्याशी व्यवहार आणि त्यांचे समर्थन करण्याचे विवरण आपल्या डोळ्यांसमोर येऊन जाते. या समस्त बाजुंनी स्वयं अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) आणि त्यांच्या पत्नींचा आणि मुलाबाळांचा उल्लेख सुद्धा पवित्र कुरआन मध्ये आहे.

येथे एक प्रश्न उद्‌भवतो, तो हा की अल्लाहच्या संदेष्टांनी (पैगंबरांनी) पारिवारीक जीवन व्यतीत केले आणि त्याच्या समस्या आणि गुंतागुंतीपासून

अलिप्त राहून फक्त अल्लाहच्या उपासनेतच का लागुन गेले नाहीत? याचे उत्तर हे आहे की कौटुंबिक जीवनाने धर्म एवंम नैतीकतेस जी उन्नती मिळते आणि सहानुभूती, सहयोग आणि शुभचिंतनाच्या पुनीत (पुण्याईच्या) भावना पाळल्या व वाढल्या जातात आणि आत्मनियंत्रण आणि सुधार तसेच प्रशिक्षणाच्या ज्या संधी मिळतात, त्या इतर कोणत्याही साधना द्वारे प्राप्त होत नाहीत.

## कुटूंबाचे धर्मात स्थान

याचा अर्थ असा आहे की, कुटूंब केवळ सामाजिक संस्थाच नाही तर तिला धार्मिक आणि नैतिक स्थान सुद्धा प्राप्त आहे. जी व्यक्ति कौटुंबिक जीवन व्यतीत करते. ती वास्तवात पैगंबरांच्या पद्धतीवर आचरण करते आणि आपल्या जीवन चरित्रास तसेच शिष्टाचारास कुटूंबाच्या माध्यमाने उच्च करीत असते.

इस्लाम ने सामाजिक जीवनात कुटूंबाला आधारभूत महत्व दिले आहे. तो ज्या प्रकारच्या कुटूंबाचे गठन इच्छितो, त्याची रूपरेखा स्पष्ट केलेली आहे. त्याने दाम्पत्य जीवन, त्याचे उत्तरदायीत्व, त्याच्या समस्यांना, कुटूंबाच्या सदस्यांशी संबंध, त्यांच्या अधिकारांना आणि त्यांच्याशी संबंधीत समस्त गोष्टीबद्दल विस्तृत मार्गदर्शन केलेले आहे आणि आपल्या अनुयायींना त्यांचे आज्ञाधारक बनविले आहे.

## कुटूंब पुरुष आणि स्त्री च्या माध्यमाने अस्तित्वात येत असते

कुटूंब केवळ पुरुषांच्या किंवा केवळ स्त्रियांच्या एकत्र होण्याचे नाव नाही, तर त्याच्या निर्माण आणि जडणघडणात पुरुष आणि स्त्री दोघांना आपली आपली भूमिका निभवायची असते. जर एखाद्या सोसायटीत काही पुरुष अथवा काही स्त्रिया परस्पर मिळून मिसळून जीवन व्यतीत करू लागल्या आणि अस्वाभाविक पद्धतीने आपली कामतृप्ती पूर्ण करू लागले तर त्याला कुटूंब/परिवार म्हणता येणार नाही. या काळात पाश्चात्य जगतात समलैंगिक संबंधाची जी प्रवृत्ती उन्नती पावत आहे, ती पारिवारीक व्यवस्थेची दुर्दशा आणि विनाशाची तीव्र प्रतिक्रिया आहे. यामध्ये एक पुरुष दुसऱ्या पुरुषासोबत आणि एक स्त्री दुसऱ्या स्त्रीच्या सोबत जीवन व्यतीत करू लागतात. हेच त्यांचे घर आणि कुटूंब असते आणि त्यात एकमेकांचे अधिकार सुद्धा निश्चित करून घेतले गेले आहेत. असे असुन

सुद्धा की असा समलैंगीक शारीरिक संबंध केल्याने विभिन्न प्रकारचे रोग पसरत आहेत, ही जीवनशैली परिवाराच्या उद्देश्यांची पुर्तता कदापीही करू शकत नाही.

### लैंगिक संबंधाचे महत्त्व

कुटूंबाची आरंभता पुरुष आणि स्त्रिच्या लैंगिक संबंधानी होते, यामुळे परिवाराच्या गठनात यास आधारभूत महत्त्व प्राप्त आहे. या संबंधाच्या बाबतीत दोन दृष्टीकोन आढळतात. एक दृष्टीकोन संन्यासचा[१] आहे आणि दुसरा संसारवादिते[२] चा आहे हे दोन्हीही दृष्टीकोन अनैसर्गिक आणि संतुलित मार्गापासून वेगळे आहेत.

### संन्यास : लैंगिक संबंध विरोधी

संन्यास काम-भावनांना दाबण्या आणि कुचलण्याची शिकवण देतो आणि त्यास आध्यात्मिक उन्नत्तीचे साधन मानतो, परंतु हे मानवी स्वभावाविरुद्ध आहे. यावर हजारो आणि लाखो लोकांमधून केवळ दोन-एकच मुश्कीलीने अंमल करू शकतात. मनुष्यात कामुक भावना व इच्छा तीव्र आढळतात की तो अशा प्रकारच्या प्रतिबंधांना स्वीकारू शकत नाही. त्याच्या समोर या इच्छेच्या पूर्तिचे योग्य आणि वैध मार्ग बंद असतील तर तो चुकीच्या मार्गांवर चालू लागेल.

संन्यास वास्तवात मानवीय प्रकृतिच्या अपेक्षांपासून दूर पळण्याचे एक रुप आहे ज्यास धर्माचे नाव दिले गेले आहे. यावर एखाद्या समाजाचे नवनिर्माण (निर्मिती) होऊ शकत नाही.

---

१. सन्यास-या जीवन प्रणालित लोक संपुर्ण आयुष्य अविवाहीत राहतात. उत्तम अन्नपान त्यागतात. स्त्रीयांपासून दूर राहतात. कामवासनेपासून मुक्त राहण्यासाठी लिंग कापून टाकतात, पहा हिन्दुतील चतुर्थ आश्रम.

२. मूळ अरबी शब्द इबाहीयन आहे. हा सप्रदाय अल्लाह आणि परलोक दोन्ही मानत नाही. भौतिक सुख लोलुपता व भौतिक उपभोग आस्था असते. कोणत्याही मार्गाने सुखलोलुपता प्राप्त करतात. त्यांची धारणा आहे की मनुष्य दुष्कर्मापासून दूर राहू शकत नाही.

## भौतिकता (बंधन मुक्त चंगळवाद) चे तोटे

दुसरा दृष्टीकोन भौतिकवाद (बंधन मुक्त चंगळवाद) आहे. हा कामतृप्तीसाठी पूर्ण स्वच्छंदता इच्छितो आणि कोणत्याही मर्यादेचा आणि प्रतिबंधाचा अभिलाषी नाही. हे आचरण व्यक्ति आणि समाज दोघांसाठीही अत्यंत हानीकारक आहे. यामुळे मानवाच्या शारिरीक आणि मानसिक शक्ती वाईट प्रकारे प्रभावित होतात आणि अनेकजण अशा प्रकारांच्या रोगांचा शिकार व्हायला आणि विनाशाकडे जायला लागतो. हा दृष्टिकोन समाजास लैंगिक विक्षिप्तता आणि आवरागर्दीकडे घेऊन जातो. यात व्यक्ति लैंगिक सुख तर प्राप्त करतो, परंतु त्याच्या प्रतिफळाच्या रूपात होणाऱ्या अपत्यास स्त्रीच्या माथ्यावर टाकून वेगळा जबाबदारीपासून मुक्त होऊन जातो. किंवा दोघेही त्यापासून जबाबदाऱ्या टाकून मुलाला एखाद्या जनसेवीसंस्था अर्थात अनाथालयात वा राज्याच्या हवाली करून टाकतात. या संस्था मुलाच्या भौतिक आवश्यकतांना तर काही सीमेपर्यंत पूर्ण करू शकतात, पण त्या प्रेमापासून शून्य असतात ज्या माता-पित्यांच्या हृदयात उंचबळत असतात आणि मुलांमध्ये स्थानांतरीत होत असतात. अपत्याच्या उत्तरदायीत्वापासून वाचण्यासाठी पश्चिमी जगतात, ''संतानहीन परिवार'' (Childless Family) ही प्रवृत्ती सार्वत्रिक होत चालली आहे. याचे दोन तोटे अत्यंत स्पष्ट आहेत. एक हा की माणसांमध्ये जबाबदाऱ्यांपासून वाचणे आणि वैयक्तिक सुख आणि स्वादाच्या प्राप्तीची प्रवृत्ति उत्पन्न (निर्माण) होते आणि तो कोणत्याही सामाजिक आणि नागरिक उत्तरदायीत्वाला स्विकारायला तयार होत नाही. दुसरे हे की जर अपत्याशिवाय जीवन जगण्याची प्रवृत्ती सार्वजनिक राहीली तर जनसंख्येत अनिवार्यत: कमी होईल, समाज मानव शक्ती ने वंचित होत जाईल आणि आपल्या आवश्यकतांची (गरजांची) पूर्ति करण्यासाठी त्यास बाहेरच्या लोकांची सहायता घ्यावी लागेल.

## विवाहकामतृप्तीची वैध पद्धत :

इस्लाम संन्यास आणि चगंळवाद (बंधनमुक्त चंगळवाद) दोघांच्या विरुद्ध आहे. काम-भावना त्याच्या दृष्टीत एक स्वाभाविक भावना आहे आणि त्याची पूर्तता चुकीची नाही. परंतु इस्लाम या गोष्टीला अनिवार्य ठरवतो की ही पुर्तता वैध पद्धतीने व्हायला पाहीजे यासाठी अवैध पद्धत अवलंबविण्यास हराम ठरवतो.

अशा अवैध पद्धतीने कामतृप्तिला तो व्यभिचार म्हणतो आणि त्याची कठोर शिक्षा प्रस्तावित करतो. तो समाजाला व्यभिचार आणि त्यावर उभारणाऱ्या गोष्टींपासून पवित्र ठेवू इच्छितो. तो ईमानधारकची एक विशेषता कथन करतो की,

"जे आपल्या गुप्तांगाचे रक्षण करतात. शिवाय आपल्या पत्नी आणि त्या स्त्रियांखेरीज ज्या त्यांच्या अधिकारात आहेत. ज्यांच्यापासून (सुरक्षित न ठेवण्यात) ते निंदनीय नाहीत. जे लोक याशिवाय काही आणखी अन्य पद्धत इच्छित असतील तर असेच लोक सीमोल्लंघन करणारे आहेत." (दिव्य कुरआन, २३:५-७)

पवित्र कुरआनच्या उपरोक्त आयतींमध्ये कामतृप्तीच्या दोन वैध पद्धती कथीत झालेल्या आहेत. त्या आहेत पत्नी आणि दासींद्वारा कामतृप्ति प्राप्त करणे. वर्तमान काळात व्यवहारत: दासींचे अस्तित्व नाही. जरी कुणी व्यक्ति दासी ठेवू इच्छित असला तरी सुद्धा ठेवू शकत नाही, म्हणुन आता पत्नीशीच संबंध ठेवणे एक वैध मार्ग राहुन गेलेला आहे.

विवाहचे प्रयोजन स्त्रीला दाम्पत्यात आणण्याची पद्धत आहे. विवाह एक वचन तसेच प्रतिज्ञा आहे. जो पुरुष आणि स्त्रीच्या स्वतंत्र इच्छेने अस्तित्वात येतो. यात कुणासोबत बळ आणि अत्याचाराचा सहभाग लेशमात्र सुद्धा नसतो. पुरुष स्वत:हुन याचा निर्णय घेतो आणि स्त्रीची अनुमती सुद्धा यासाठी अनिवार्य आहे. जर एखाद्या अज्ञान आणि अल्पवयीन मुलींचा विवाह झाला तर तरूण झाल्यावर ती आपल्या विचाराचा आणि अधिकाराचा फेरविचार करू शकते.

## विवाहाचे वैधानिक महत्त्व

विवाहास इस्लामी धर्मशास्त्रींनी वैध म्हटले आहे. काहींच्या जवळ तो चांगला आणि प्रिय आहे, काहींनी याला पैगंबरांची ती निती जिचे अवलंबविणे अनिवार्य असावे अर्थात सुन्नत म्हटले आणि यास अपरिहार्य दाखविले आहे. परंतु जर व्यक्ति अशा परिस्थितीत घेरला जावा की व्यभिचार आणि दुष्कर्मात लिप्त होऊन जाण्याचा भयंकर धोका असावा आणि तो आर्थिक दृष्टीने दाम्पत्य उत्तरदायीत्वांना पूर्ण करू शकत असावा तर विवाह त्यासाठी अपरिहार्य होऊन जातो.

## समाजाने विवाह कार्यास सहायता करावी

इस्लाम ने समाजाला सचेत केले आहे आणि त्यांना निर्देश दिला आहे की त्याने अविवाहीत लोकांच्या विवाहाचा प्रबंध करावा आणि या विषयात त्यांच्याशी सहयोग करावा यासाठी की कोणी व्यक्ति केवळ संसाधनाच्या अभावाच्या कारणाने अविवाहित जीवन जगण्यावर विवश होते तर आदेश आहे,

"आणि तुमच्यापैकी जे लोक अविवाहित असतील आणि तुमच्या दास-दासींपैकी जे सदाचारी असतील त्यांचे विवाह करून द्या. जर ते गरीब असतील तर अल्लाह त्यांना आपल्या कृपेने श्रीमंत बनवील. अल्लाह विशाल आणि सर्वज्ञ आहे आणि ज्यांना विवाहाची संधी उपलब्ध नसेल, त्यांनी संयम अंगिकारावा येथ पावेतो की अल्लाह आपल्या कृपेने त्यांना समृद्ध बनवील."

(दिव्य कुरआन, २४ : ३२-३३)

## अवैध लैंगिक संबंधाचा निषेध :

इस्लाम या गोष्टीला अवैध ठरवितो की कोणत्याही पुरुष आणि स्त्री मध्ये अवैध लैंगिक संबंध स्थापित व्हावा. त्यांच्यात अपराधाची जाणीव वाढत फलत-फुलत रहावी आणि ते आपल्या उत्तरदायीत्वाशी वाचण्याचा प्रयत्न करू लागावेत. ज्या स्त्रिया पुरुषासाठी निषिद्ध आहेत, ज्यांच्याशी त्यांचा विवाह होऊ शकत नाही, त्यांचा उल्लेख केल्यानंतर म्हटले गेले.

"यांच्याखेरीज इतर ज्या स्त्रिया आहेत त्यांना आपल्या संपत्तीद्वारे प्राप्त करणे तुमच्यासाठी वैध करण्यात आले आहे. परंतु अट अशी की त्यांना विवाह बंधनात सुरक्षित करा असे नव्हे की तुम्ही स्वच्छंद कामतृप्ती करू लागाल."

(दिव्य कुरआन, ४:२४)

## विवाहाची घोषणा :

इस्लाम हे इच्छितो की विवाहाची घोषणा व्हावी आणि ती सर्वासमोर व्हावी, यासाठी की समाज यागोष्टी पासून परिचित व्हावा की अमुक पुरुष आणि स्त्री दांपत्य संबंधात बांधले आहेत, ते एकमेकांचे जीवन साथी बनुन गेले आहेत

आणि याच्या नैतिक आणि वैधानिक उत्तरदायित्वांना उचलण्याचे वचन आणि प्रतिज्ञा करून घेतली आहे, कारण की आवश्यकता पडल्यावर समाज स्वयं सुद्धा त्यांच्या उत्तरदायीत्वांना निभाविण्यात त्यांना सहायता करू शकेल आणि या विषयात त्यांच्याकडून कमतरता झाली तर पकड करू शकेल. यासाठी विवाहाच्या प्रमाणासाठी कमीत-कमी दोन साक्षीदार (गवाहांचे) असणे जरूरी ठरविले गेले आहे, याशिवाय विवाह होऊ शकत नाही.

### दाम्पत्य संबंध प्रेमाचे संबंध आहे :

दाम्पत्य संबंध वास्तवात प्रेमाचा संबंध आहे. त्याला त्याच दृष्टीने पाहीले जावे आणि बाकी ठेवले पाहीजे. पुरुषाने स्त्रीला आपलेच अंग समजावे आणि स्त्री त्यासाठी शांतीचे कारण म्हणून सिद्ध व्हावे. पवित्र कुरआन सांगतो की या नात्यात विचार विनिमय करणारे लोक अल्लाहच्या मोठ्या निशाण्या पाहु शकतात.

''आणि त्याच्या संकेत चिन्हांपैकी ही आहे की त्याने तुमच्यासाठी तुमच्या मधुन पत्नी बनविल्या, जेणेकरून तुम्ही त्यांच्यापाशी संतोष प्राप्त करावा आणि तुमच्या दरम्यान प्रेम आणि करूणा उत्पन्न केली, निश्चितच यात बरीच संकेत चिन्हें आहेत, त्या लोकांसाठी जे मनन व चिंतन करतात.'' (दिव्य कुरआन, ३०:२१)

### पति-पत्नीचे अधिकार आणि त्यांचे उत्तरदायित्व

दाम्पत्य संबंध केवळ कामतृप्तिचे साधनच नाही आहे तर यामुळे कुटूंबनिर्मीतीची सुरवात होत असते. यात पुरुष आणि स्त्री दोघांचे अधिकार आहेत जे त्यांना प्राप्त होतात आणि दोघांचे उत्तरदायित्व सुद्धा आहेत. ज्यांचे ते दोन्हीही आचरणकर्ते राहतील. कुरआन ने मोठ्या स्पष्टतेने सांगितले आहे.

''आणि स्त्रियांचा हक्क आहे (पुरुषांवर) जसा की पुरुषांचा त्यांच्यावर हक्क आहे.'' (दिव्य कुरआन, २:२२८)

विवाह विच्छेद तलाकच्या आदेशा अंतर्गत आज्ञा आहे -

''आईला या कारणास्तव त्रास दिला जाऊ नये की मूल तिचे आहे, आणि

पित्याला सुद्धा या कारणास्तव त्रास दिला जाऊ नये की मूल त्याचे आहे."

(दिव्य कुरआन, २:२३३)

पुरुषाचे उत्तरदायीत्व आहे की त्याने उपजीविकेसाठी धावपळ करावी. पत्नीच्या निर्वाह पोषणाचा खर्च सहन करावे, घर आणि त्याच्या आवश्यक वस्तु उपलब्ध कराव्यात. स्त्रीने घराची व्यवस्था सांभाळावी, त्याला एक उत्तम आणि पद्धतशीरतेचे घर बनवावे, आपली आणि पतिची प्रतिष्ठा तसेच मान-सम्मानाची रक्षा करावी. मुलांची देखरेख आणि त्यांना उत्तम प्रशिक्षण व सभ्यतेने आभुषित करावे. अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांचे कथन आहे-

"पुरुष आपल्या घरच्यांचा संरक्षक (देखरेख करणारा) आहे आणि त्याला त्याच्या प्रजे (अर्थात परिजनां) विषयी कयामतीच्या दिवशी विचारले जाईल आणि स्त्री आपल्या पतिच्या घरचे आणि त्याच्या मुलांची संरक्षिका (देखरेख करणारी) आहे आणि तिच्याशी त्यांच्या बाबतीत कयामतीच्या दिवशी प्रश्न विचारला जाईल. (हदीस-बुखारी)

मतभेदांना दूर करण्याचे उपाय :

दाम्पत्य जीवनामध्ये सुद्धा मतभेद आणि विवाद उत्पन्न होऊ शकतात. आदेश आहे की त्या मतभेदांना आणि विवादांना पति-पत्नी स्वयंमच आपल्या बुद्धीविवेकाने दुर करण्याचा प्रयास करावा. पुरुषाने विशाल हृदयता आणि धैर्य तसेच सहनशिलतेचे प्रदर्शन करावे. पत्नीचे आचरण चुकीचे आणि अप्रिय असेल तर समजविण्याचे प्रयास करणे. परिस्थितीला ठिक करण्यासाठी तो नाराजीचे प्रदर्शन सुद्धा करू शकतो आणि शयनस्थळ अर्थात अंथरूणापासून वेगळा राहु शकतो, परंतु एका सीमेपेक्षा पुढे जाण्याचा त्याला अधिकार नाही. याच प्रकारे स्त्री, पुरुषात बेपरवाही (निष्काळजीपणा, बेफीकरीपणा) पहात असेल तर आपल्या अधिकारांवर जिद्द करण्याचा स्थानी अधिकारांना सोडणे मान्य करून घ्यावे. यामुळे सुद्धा संबंध ठिक झाले नाहीत तर दोघा पक्षांच्या दोन लोकांना पंच मानून त्यांच्या निर्णयास स्वीकार करून घेतले जावे. याद्वारे सुद्धा संबंध चांगले होऊ शकले नाहीत, तर विवाहविच्छेद (तलाक) किंवा खुलअ[१] द्वारे

१. खुलअ - त्या विवाहविच्छेदनाला म्हणतात ज्यात स्त्रीने स्वत: विवाहविच्छेदनाची मागणी करावी.

पृथकता अंगिकारली जावी यासाठी की दोघेजण दाम्पत्य बंधनापासुन मुक्त होऊन आपल्या भविष्याचा फैसला (निर्णय) करू शकावेत.

### केवळ वैध संततीना अधिकार आहेत :

मनुष्यामध्ये अपत्याची (सतंती) इच्छा स्वाभाविक रूपाने आढळली जाते. तो आपल्या अपत्याशी भावनात्मक संबंध ठेवीत असतो आणि त्याच्याशी अत्यंत प्रेम करतो. तो तिच्या पासुन आत्मसुख तसेच शांतिचा आभास करतो आणि त्यावर आपले धन-धान्य आणि खर्च करून आनंदाची जाणीव प्राप्त करतो. तो इच्छितो की त्याद्वारे त्याचे नाव बाकी रहावे. त्यांचा वंश चालत राहावा तो त्याला आपले धन व संपत्ती पैसा व मालमत्ता आणि संसाधनाचा वैध उत्तराधिकार मानतो. इस्लाम या भावनेला चुकीची समजत नाही. त्याने याला शेष ठेवले आहे आणि अपत्याची उत्प्रेरणा दिली आहे.

''अल्लाहने तुमच्यासाठी विहित केले आहे त्याची इच्छा करा.''

(दिव्य कुरआन, २:१८७)

विवाहाच्या माध्यमाने जी संतान होईल तीच वैध संतान असेल आणि तिलाच वैधानिक अधिकार प्राप्त होतील. अवैध लैंगिक परिणामाच्या स्वरूप जे मुल जन्माला येईल, त्याचा वैधानिक रूपाने कोणताही अधिकार नाही. स्वयंम त्या मुलावर त्याचा कोणताही अधिकार स्वीकार केला जाणार नाही. दोघांमधुन कुणीही दुसऱ्याचा उत्तराधिकारी (वारस) असणार नाही.

अपत्याचे (संततीचे) वैधानिक आणि नैतिक अधिकार आहेत. त्या अधिकारांना पार पाडणे आईवडिलांसाठी अनिवार्य आहे. त्यांना आर्थिक किंवा सामाजिक ओझे समजुन समाप्त केले जाऊ शकत नाही. त्यांचे भोजन, वस्त्र आणि अन्य आवश्यकतांची पुर्ती केली जाईल. त्यांच्याशी प्रेम आणि दयेचा व्यवहार केला जाईल. त्यांना उत्तम शिक्षा व प्रशिक्षण दिले जाईल. देवाण-घेवाणात त्यांच्याशी भेदभावाचा व्यवहार अवलंबिला जाणार नाही. मूले आणि मूली यांच्याशी समान व्यवहार अवलंबिला जाईल.

कुटूंब अल्लाहची देणगी (बक्षीस/प्रसाद) आहे.

दाम्पत्य संबंधामुळे पूर्ण कुटूंब अस्तित्वात येते. संतान, आई, वडील, भाऊ, बहीण, आणि त्यांच्या संबांधानी खुप असे अन्य संबंध स्थापित होत असतात. कुटूंबाचे अस्तित्व अल्लाहचा अनुग्रह आणि उपकार आहे. सामाजिक जीवनात याचे फार असे महत्त्व आहे. हिच गोष्ट या शब्दांत उल्लेखीत झालेली आहे.

''आणि तो अल्लाहच आहे ज्याने तुमच्यासाठी तुमच्या सहचारिणी पत्नी बनविल्या आणि त्यानेच या पत्नींपासून तुम्हाला पुत्रपौत्र प्रदान केले आणि चांगल्या चांगल्या वस्तू तुम्हाला खावयास दिल्या. मग काय हे लोक (हे सर्वकाही पाहत व जाणत असतांना देखील) असत्याला मानतात आणि अल्लाहचे उपकार नाकारतात.'' (दिव्य कुरआन, १६: ७२)

परिवार तथा कुटूंबातील लोकांशी व्यक्तीचे संबंध दुरचे व जवळचे असतात. कोणाशी त्यांचे रक्ताचे नाते आणि कोणाशी माध्यमी असते. याच दृष्टीने जीवनात त्याचे हक्क व अधिकार आणि जबाबदाऱ्या निर्धारित होतात आणि मेल्यानंतर ते एक-दुसऱ्याचे वैधानिक वारस असतात. वारसा संबंधी आदेश आहे.

''तुम्हाला माहीत नाही की तुमचे आई-वडील व तुमच्या संततीपैकी कोण लाभाच्या दृष्टीने तुमच्या अधिक जवळ आहे.'' (दिव्य कुरआन, ४:११)

नातेवाईकांशी सद्व्यवहाराची आज्ञा

पवित्र कुरआनात वारंवार आदेश दिला गेला आहे की, नातेवाईकांचे अधिकार आणि हक्क अदा केले जावेत. सांगितले गेले,

''आणि नातेवाईकांचे हक्क अदा करा.'' (दिव्य कुरआन, १७:२६)

हिच गोष्ट सूरह १६ (नहल) आयत ९० मध्ये आहे.

अर्थात अल्लाहचा आदेश आहे की, नातेवाईकांचा हक्क अदा करा. हे हक्क व अधिकार परिस्थितीच्या दृष्टीने वैधानिक आणि नैतिक दोन्ही प्रकारांचे आहेत.

आप्तसंबंधी (नातेवाईक) आणि कुटंबातील लोक लांबचे असोत अथवा जवळचे, त्यांच्याशी सद्व्यवहार, सहानुभूती आणि शुभचिंतनाचा व्यवहार अवलंबविला जाईल आणि त्यांच्या सुख-दुःखात सहभाग घेतला जाईल. अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांनी ज्या गोष्टींची शिकवण दिली त्या गोष्टींमध्ये ही गोष्ट सुद्धा सामील आहे.

"आईवडिलांशी नातेवाईकांशी, अनाथ व गोरगरीबांशी चांगला व्यवहार करा." (दिव्य कुरआन, २:८३)

आप्तस्वकियांशी (नातेवाईकांशी) केला जाणारा हा 'सद्व्यवहार' यास इस्लामी परिभाषेत "सिलारहमी" शब्दाने अभिव्यक्त केले जात असते.

आप्तस्वकीयांशी (नातेवाईकांशी) अत्यंत चांगला व्यवहार करणाऱ्यांची प्रशंसा केली गेली आहे.

पवित्र कुरआनत आहे,

"ते जोडतात त्या संबंधांना (नात्यांना) ज्यांना जोडण्याचा अल्लाहने आदेश दिला आहे आणि आपल्या पालनहार अल्लाहचे भय बाळगतात."

(दिव्य कुरआन, १३:२१)

वास्तवात इस्लाम हे इच्छितो की समाजाचा प्रत्येक तो व्यक्ति ज्याची भौतिक दृष्टया व आर्थिक दृष्टीने चांगली परिस्थिती आहे तो कुटूंबाचा तथा परिवाराच्या त्या लोकांची सहायता करेल जे गरजू (मोहताज) आहेत आणि त्यांना या योग्य बनवावे की जीवनाच्या व्यवहारात (व्यापार-विनिमयात) ते आपले कर्तव्य पूर्ण करू शकावेत.

## परिवाराचे धार्मिक आणि नैतिक प्रशिक्षण

पत्नी-मुलंबाळ आणि कुटूंबावाल्यांच्या भौतिक आणि आर्थिक आवश्यकताच्या पुर्तिच्या सोबतच त्यांची धार्मिक आणि नैतिक परिस्थिती चांगले करणे आणि त्यास उत्तमोत्तम बनविण्याचा प्रयत्न करायला हवा. ही मनुष्याच्या आपल्या धर्म आणि आस्था आणि कुटूंबावाल्यांशी शुभ-चिंतनाची अपराहार्य अपेक्षा आहे. यापासून निष्काळजीपणा (बेपरवाही) संसार आणि परलोक यांच्या विनाशाचे कारण बनेल कुरआनने स्पष्ट शब्दांमध्ये म्हटले आहे -

"हे लोकहो ! ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, वाचवा स्वत:ला आणि आपल्या कुटूंबियांना त्या अग्निपासून जिचे इंधन मनुष्य आणि दगड असतील."

(दिव्य कुरआन, ६६:६)

संततीचे (अपत्याचे) पालन-पोषण या प्रकारे व्हावे की तो केवळ एक पशु अथवा मनईच्छांचा दास बनून राहु नये, तर तिच्यात अल्लाहचे भय, तकवा (ईशपरायणता) आणि परलोकाचे भय उत्पन्न व्हावे. ते निर्माणकर्त्याचे वफादार

दास आणि अल्लाहच्या सृष्टीच्या प्रति शुभचिंतक बनून वृद्धीगत व्हावेत. संसारात भलाईस आम करावे पापाला आणि उपद्रवाला फैलू देऊ नये आणि त्यांच्या मध्ये या मार्गात कष्ट सहन करण्याचे दृढ-संकल्प आणि साहस असावे.

आदरणीय लुकमान आपल्या मुलास सांगतात,

"हे माझ्या मुला (बेटा) नमाज कायम कर, सत्कृत्यांचा आदेश दे, दृष्कृत्यांची मनाई कर, आणि जी काही आपत्ती येईल त्यावर संयम राख. निस्संदेह हे त्या कामांमधून आहे जे साहसाचे आहेत."

(दिव्य कुरआन, ३१:१७)

आदरणीय लुकमान यांनी आपल्या मुलास जी (शिकवण) दिली होती या त्यातील काही आहेत. त्यांनी आणखीनही काही उपदेश केले. पिता आणि पुत्राच्या संबंधाची स्थिती अन्य संबंधापेक्षा भिन्न असते. पित्याच्या उपदेशाला पुत्र आदेश समजून स्विकार करू शकतो आणि त्याचा पायबंद होऊ शकतो. याची आशा अन्य प्रत्येकाकडून केली जाऊ शकत नाही. यापासून ही गोष्ट अवश्य निघते की, कुटूंबाचे जे लोक मनुष्याच्या प्रभावा आधिन आणि जे त्याची गोष्ट ऐकू शकतात, त्या सर्वांना भलाई आणि सुधाराच्या मार्गावर लावणे त्याची धार्मिक आणि नैतिक जबाबदारी आहे.

येथे इस्लामच्या पारिवारीक व्यवस्थेचे अतिशय संक्षेपात विवरण केले गेले आहे. यावरून समजले जाऊ शकते की इस्लाम परिवारास समाजाच्या एका पुण्यवान आणि मजबुत संस्थेच्या रूपात अस्तित्वात आणतो आणि त्याला उन्नती देतो. तो त्याच्या भौतिक आवश्यकतांना नजरआड करत नाही. त्यांच्या नैतिक अपेक्षांना तो दोहोंना पुर्ण महत्व देतो. त्यात कोणत्याही बाजूने कमतरता असेल तर त्यांच्यात सुधार आणि उचित उपाय करतो. परिवाराची रचना जर योग्य चालीरितींवर असेल आणि तो सुआचरणांना अवलंबू लागला तर पूर्ण समाजाचीच दिशा योग्य होऊन जाईल आणि त्यांचा प्रवास अगदी योग्य दिशेत व्हायला लागेल. यासाठी की कुटूंबाच्या समुहानेच समाज अस्तित्वात येत असतो. कुटूंबापासून त्याला जी ऊर्जा आणि शक्ति प्राप्त होत असते, ती कोणत्याही इतर माध्यमापासून मिळू शकत नाही.

समाप्त